अपंग व्यक्तींच्या स्वयंरोजगारासाठी
बीज भांडवल योजना....

महाराष्ट्र शासन
समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग
मंत्रालय, मुंबई 32.

शासन निर्णय -- क्र. इडीडी– 1087 / 28863 / 158 / सुधार 2 दिनांक 8 नोव्हेंबर 1989

वाचा –1. शासन निर्णय समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक इडीडी 1087 / 28863 / 158 / सुधार 2 दिनांक 5 जानेवारी 1989.
2. शासन निर्णय समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. इडीडी– 1087 / 28863 / 158 / सुधार 2 दिनांक 19 जानेवारी 1989.

शासन निर्णय –अपंगांना स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करून देण्याकरिता वर नमूद केलेल्या दिनांक 5 जानेवारी 1989 च्या शासन निर्णयान्वये बीजभांडवल योजना मंजूर करण्यात आली असून दिनांक 19 जानेवारी 1989 च्या शासन निर्णयान्वये त्या योजनेत अंशतः बदल करून योजनेच्या अंमलबजावणीच्या संदर्भात काही सुचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

2. त्यापैकी दिनांक 5 जानेवारी 1989 च्या शासन निर्णयाच्या परिच्छेद 1 मधील क्रमांक 4 येथे लाभार्थ्यांचे वार्षिक उत्पन्न रूपये 6600/– पेक्षा जास्त नसावे असे नमूद करण्यात आलेले आहे. त्याऐवजी लाभार्थ्यांचे वार्षिक उत्पन्न रूपये 6,000/– रूपये सहा हजार फक्त पेक्षा जास्त नसावे असे वाचण्यात यावे.

3. सदरहू योजनांतर्गत स्वयंरोजगाराच्या प्रकल्पाच्या एकूण खर्चापैकी 20 टक्के रक्कम जास्तीत जास्त रूपये 5000 पर्यंत बीज भांडवल अनुदान म्हणून मंजूर करावयाची असून उर्वरित रक्कम बँकेमार्फत कर्जाच्या रूपाने संबंधित लाभार्थ्यास उपलब्ध करून द्यावयाची आहे. असे असले तरी बँकेमार्फत मंजूर करण्यात येणा–या कर्जावरील व्याजाचे संदर्भात उपरोक्त आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात आलेला नाही. करिता स्पष्ट करण्यात येते की, अपंगांना दिलेल्या कर्जापैकी काही रकमेवर बँकांच्या नियमानुसार डी.आर.आय. – डिफरन्स इन रेट ऑफ इन्टरेस्ट योजनेखाली 4 टक्के दराने व्याज आकारले जाईल आणि उर्वरित रकमेवर बँकांच्या नियमानुसार व्याज आकारले जाईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

ज.द. बशरकार
सहायक सचिव.

GR-20020919160810000-1500